# ज्योतिषशास्त्राच्या आव्हानप्रक्रियेतून

# अंधश्रद्धा निर्मूलनवाद्यांचे पलायन

मसलेचौधरी (जि. सोलापूर) येथील अनुराधाबाई देशमुख यांच्या विभूती-चमत्काराच्या प्रकरणामुळे महाराष्ट्रातील अंधश्रद्धा निर्मूलन समितीचे (अंनिस) पितळ उघडे पडले असून प्रस्तुत लेखकाच्या हिशेबी ही समिती मागेच संपली आहे.'[1] या समितीचे कार्य समाजातील बुवाबाजी नाहीशी करणे हे आहे, असे सांगण्यात येते. पण विज्ञानाच्या नावाखाली सर्वात मोठी बुवाबाजी खुद ही समितीच करीत असल्याचे कडेगाव (जि. सांगली) येथील भानामतीच्या प्रकरणाने सिद्ध झाले असल्यामुळे तिला हे सामाजिक कार्य करण्याचा नैतिक हक्क राहिलेला नाही.'[2] या समितीविषयी काही लिहिणे म्हणजे श्रम व वेळ यांचा अपव्यय आहे, असे स्पष्ट मत प्रस्तुत लेखकाचे झाले असल्याने त्याने इतके दिवस या समितीची उपेक्षा केली होती. पण काही महिन्यांपूर्वी पुण्याचे प्रसिद्ध परमानसशास्त्रज्ञ प्रा. व. वि. अकोलकर यांचे मला अचानक एक पत्र आले. आणि आज मला या समितीविषयी पुन्हा नाइलाजाने लेखनप्रपंच करावा लागत आहे. (हे १९९३ साली केलेले लेखन आहे.) प्रा. अकोलकरांनी प्रस्तुत पत्रात अंनिस व अखिल भारतीय ज्योतिष- संस्थेचे संचालक श्री. गिरीश शहा यांच्यामधील ज्योतिषविषयक वादाकडे माझे लक्ष वेधले होते. या वादात 'ज्योतिष हे शास्त्र आहे का' या प्रश्नाच्या कसोटीसाठी ज्या अटी पाळावयाच्या, त्यांची स्वतःअकोलकरांनी तयार केलेल्या (न श्री. शहा यांना पाठविलेल्या) यादीची एक प्रत व शहा यांनी उत्तरादाखल पाठविलेले मूळ पत्र(क) त्यांनी मला आपल्या

---

'

**2**
१. प्रकरण २ पाहा.

२. प्रकरण १ पाहा.

पत्रासोबत पाठविले होते. (अधिक माहितीसाठी लोकसत्ता व म. टाईम्स या वृत्तपत्रामधील बातम्यांची दोन कात्रणेही जोडली होती.) हे वाचून माझी पहिली प्रतिक्रिया फारशी अनुकूल झाली नाही. पण थोड्या विचाराअंती ही उपेक्षा योग्य नाही, असे वाटू लागले. आणि लगेच अकोलकरांना मी पत्राने कळविले, की या वादात काही करता येते का हे पाहण्यासाठी मी श्री. शहा व अंनिसचे सांगलीचे कार्यकर्ते यांची प्रत्यक्ष भेट घेतो. त्याप्रमाणे प्रथम शहा यांना भेटलोही. पण पुढील घटना सांगण्यापूर्वी अंनिसविषयी लिहिणे म्हणजे वेळ व श्रम यांचा शुद्ध अपव्यय आहे असे म्हणणाऱ्या मला याविषयी लिहिणेच नव्हे, तर भेटी घेण्याचाही खटाटोप का करावासा वाटला हे सांगितले पाहिजे.

**'ज्योतिषशास्त्र खरे ठरले तर समिती बरखास्त करू' इति अंनिस -**

महाराष्ट्रातील अंनिसची स्थापना समाजात ज्ञानाचा वा विज्ञानाचा प्रसार करण्यासाठी झालेली नसून विशिष्ट मत प्रचार व तद्वारा सवंग वृत्तपत्रीय प्रसिद्धी मिळविण्यासाठी झालेली असल्याचे एव्हाना जाणत्या लोकांना कळून चुकले आहे. एखाद्या राजकीय पक्षाने राजकीय स्वार्थासाठी 'गरिबी हटाव'ची घोषणा द्यावी, तसे या समितीने स्वतःच्या सामाजिक प्रतिष्ठेसाठी व प्रसिद्धीसाठी 'अंधश्रद्धा निर्मूलना'ची घोषणा दिली आहे. ही गोष्ट या समितीचे लोक हातचलाखीचे वा जादूचे प्रयोग करणे, विस्तवावरून उड्या मारणे, अंगाला लिंबू टोचून घेणे, जीभ बाहेर काढून तिला खोटा त्रिशूळ अडकवणे यासारखे पोरकट प्रकार करून 'ज्ञानाचा प्रसार' करीत असतात, यावरून स्पष्ट होते. वस्तुतःलोकांची घटकाभर करमणूक या पलीकडे या चेष्टांना काही किंमत नाही. खऱ्या ज्ञानप्रसाराचा मार्ग कष्टप्रद, दीर्घ प्रयत्नाचा, शांत व सोशिकपणे, चिकाटीने, अविरतपणे व प्रसिद्धीपराङ्मुख राहून आक्रमावयाचा व वेळखाऊ आहे. प्रसिद्धीसाठी हपापलेल्या अंनिसच्या लोकांना तो रूचणारा व पेलणारा नसल्यामुळे भूत, भानामती खोटी, देवधर्म खोटे, चमत्कार खोटे, ज्योतिष थोतांड असा उथळ प्रचार करून व हे खरे सिद्ध करणाऱ्यास दोन लाख रुपये बक्षीस देऊ अशी नाटकी स्टंटबाजीची घोषणा करून प्रसिद्धी मिळविण्याचा जवळचा व सोपा मार्ग त्यांनी अवलंबिला आहे. हे तत्काळ वृत्तपत्रीय प्रसिद्धी मिळवून देण्याचे हुकूमी साधन असले, तरी ती प्रसिद्धी व प्रतिष्ठा तत्काळ धुळीस मिळवून देऊन अप्रतिष्ठा करण्यासही ते

तितकेच हुकूमी ठरते हे विसरून चालणार नाही. आणि हे ओळखूनच हे साधन (व २ लाख रुपये) हातचे जाऊ न देण्यासाठी सर्व तऱ्हेच्या वाममार्गांचा व प्रसंगवशात स्वतःच्या अशा खास बुवाबाजीचा अवलंब या लोकांना करावा लागतो. आणि नेमकी हीच गोष्ट अनुराधाबाईंच्या चमत्काराच्या व कडेगावच्या भानामतीच्या प्रकरणांनी सिद्ध झाली आहे.

हे सर्व सांगण्याचे कारण असे की, फलज्योतिष हा प्रकार चमत्कारात मोडत नसल्यामुळे 'आम्ही सांगू त्या अटीखाली चमत्कार करून दाखवा' असे म्हणून असंभाव्य अटींचा घोळ घालून कालहरण करण्याचा जो निंद्य प्रकार अंनिसचे लोक नेहमी करतात, तो येथे शक्य नसल्यामुळे आव्हान प्रक्रियेतून पळ काढण्याचा त्यांचा नेहमीचा मार्ग खुंटतो. दुसरी फलज्योतिषविषयक जमेची बाजू अशी, की फलज्योतिष ही अंधश्रद्धा आहे असे म्हणून ज्योतिष सांगणाऱ्यावर बुवाबाजीचा वा फसवणुकीचा आरोप त्यांना करता येत नाही. असा आरोप करायचाच झाला तर ज्या वृत्तपत्रांतून हे लोक आपली प्रसिद्धी मिळवतात त्या आठवड्याचे भविष्य देणाऱ्या) वृत्तपत्रांवर त्यांना प्रथम हा आरोप करावा लागेल व त्यांच्याविरुद्ध आघाडी उघडावी लागेल. हा त्यांचा आत्महत्येचा मार्ग असल्याने तो ते कधीच अवलंबणार नाहीत. पण वस्तुतःज्योतिषामध्ये कसलीही फसवणूक वा बुवाबाजी नाही. फसवणूक म्हणजे सत्य लपविणे होय. येथे सत्य भविष्याच्या पोटात असल्यामुळे ते कोणालाही खुद्द ज्योतिषालाही माहीत नसते. ते लपविणे राहोच, उलट ते उघड करून सांगण्याचाच ज्योतिषी प्रयत्न करतो. त्यामुळे फसवणुकीचा किंवा रूढार्थाने कोणाच्या अज्ञानाचा गैरफायदा घेण्याचा प्रश्न उपस्थित होत नाही. तात्पर्य, ज्योतिष फसवणुकीला वाव देणारी अंधश्रद्धा ठरत नाही.

अंधश्रद्धा ही अज्ञानातून निर्माण होते. अज्ञान नाहीसे करणे हे विज्ञानाचे कार्य असल्याने व ज्योतिष हे भविष्यकालाचे का असेना अज्ञानच नाहीसे करण्याचा प्रयत्न करीत असल्यामुळे तेही एक विज्ञान किंवा शास्त्रच ठरते असेही म्हणता येते. अंनिस हे भविष्यकालाविषयीचे अज्ञान ज्योतिष कितपत किंवा किती टक्के नाहीसे करू शकते एवढीच परीक्षा करून पाहू शकेल. टक्केवारीचा हिशेब करण्याची एक विज्ञानमान्य पद्धत असून तिचे सांख्यकीय (Statistical) निकष ठरलेले आहेत. तेव्हा वाद

निर्माण होण्याचाही प्रसंग निर्माण होत नाही. काही निमित्त काढून पळून जाण्याचा तर नाहीच नाही. अशा रीतीने ज्योतिषशास्त्र थोतांड म्हणणाऱ्या अंनिसच्या ध्येय धोरणाचा कस येथे लागतोच. पण महाराष्ट्रातील तिचे अस्तित्वही या निमित्ताने पणाला लागते. सांगलीतील अनिसने ज्योतिषशास्त्र खरे ठरले तर आपण आपली समिती बरखास्त करू असे जाहीर केले होते. या सर्व गोष्टींचा विचार करूनच मी या वादात पडण्याचे व त्यासाठी लागेल तो खटाटोप करण्याचे ठरविले.

## अंनिसचे आव्हान स्वीकारणारे हे ज्योतिषी कोण?

अंनिस व श्री. गिरीश शहा यांच्यामधील ज्योतिषविषयक वाद त्यांच्यामधील तीव्र मतभेदामुळे एका विशिष्ट अवस्थेला येऊन थांबला होता. म्हणून दोन्ही बाजूंच्या लोकांचे मन वळवून त्यांच्यात दिलजमाई घडवून आणण्यासाठी त्यांच्या वैयक्तिक भेटी घेणे आवश्यक होते. अंनिसचे आव्हान स्वीकारणारे श्री. गिरीश शहा हे कोण, हे जाणून घेण्याचे मला फार कुतूहल असल्याने प्रथम त्यांचीच भेट घेण्याचे मी ठरविले. या वादातील ज्योतिषविषयक वादाचा दर्जा त्या विषयाचे आव्हान स्वीकारणाऱ्या व्यक्तीवर अवलंबून असल्याने त्या व्यक्तीचा ज्योतिषशास्त्रीय दर्जा समजावून घेणे महत्त्वाचे आहे. म्हणून श्री. शहा यांचा परिचय येथे थोडक्यात करून देत आहे.

श्री. गिरीश शहा हे दिल्ली येथील अखिल भारतीय ज्योतिष संस्थेचे संचालक आणि बडोदा बँकेच्या सांगली शाखेचे व्यवस्थापक आहेत.[3] ज्योतिष विषयाचा अभ्यास ही त्यांच्या घराण्याची आजोबापासून चालत आलेली परंपरा आहे. स्वतः शहांखेरीज त्यांचे चुलते व बंधूही या विषयातील तज्ज्ञ आहेत. त्यांची वैचारिक बैठक विविधांगी व दृष्टी चतुरस्र असल्याचे त्यांच्या बोलण्यातून जाणवते. (ज्योतिषाचे वैज्ञानिक विश्लेषण इतके चिकित्सकपणे कोणी केलेले नाही असे अंनिसच्या

---

3 ३. श्री. गिरीश शहांना नंतर अपघात होऊन त्यांच्या हालचालींना तीव्र मर्यादा पडल्या. त्यांच्यावर आर्थिक गुन्ह्याचे प्रकरण शेकले. इ. घटना ते ज्योतिषी असूनही अगोदर कसे ओळखू वा जाणू शकले नाहीत इ. प्रश्न खासगीत विचारण्यात आले आहेत. पण प्रस्तुत प्रकरणाशी त्याचा काही संबंध नाही व त्यातील निष्कर्षावरही ते काही परिणान करू शकत नाहीत. (१९९९ साली जोडलेली टीप.)

लोकांनीच नान्य केल्याचे त्यांनी सांगितले.) त्यांनी वृत्तपत्रातून (बेंगलोरच्या प्रसिद्ध 'अॅस्ट्रॉलॉजिकल मॅगेझिन' सह) अनेक नियतकालिकांतून पंचवीसच्या वर लेख या विषयावर लिहिले आहेत. तसेच वसंत व्याख्यानमाला, लायन्स क्लब इ. संस्था व संघटनांतर्फे सांगली, बेळगाव, धारवाड, कोल्हापूर, सातारा, पुणे, मुंबई, दिल्ली इत्यादी ठिकाणी ज्योतिष या विषयावर आतापर्यंत शंभर व्याख्याने दिली आहेत. १९८६ साली लंडन येथे ज्योतिष विषयावर एक आंतरराष्ट्रीय परिषद भरली होती. या परिषदेला जगातील ६० देशातून तीनशेवर प्रतिनिधी हजर होते. भारतातील प्रतिनिधींचे धुरीणत्व श्री. शहा यांचेकडे होते. या परिषदेत शहा यांनी 'मिरॅकल ऑफ नंबर्स (अंकांचा चमत्कार) हा शोधनिबंध वाचला होता. १९९२ च्या जून आणि जुलैमध्ये त्यांनी हाँगकाँग, सिंगापूर, बँकॉक या ठिकाणी 'भारतीय ज्योतिष' या विषयावर अनेक संस्थांतर्फे व्याख्याने दिली आहेत. खास डॉक्टर लोकांसाठी 'मेडिकल अॅस्ट्रॉलॉजी' (वैद्यकीय ज्योतिष) नावाचा एक खास शिक्षणक्रमही त्यांनी तयार केला असून असा एक शिक्षणक्रम त्यांनी शिकवून पूर्ण केला आहे. या शिक्षणक्रमात ५० नामांकित शस्त्रवैद्य (सर्जन) सामील झाले होते. हा शिक्षणक्रम 'इंडियन काँप्लीमेंटरी थेरपिस्ट असोसिएशन' तर्फे तयार करण्यात आला आहे.

श्री. शहा यांनी ज्योतिषाचा अभ्यास व्यवसाय म्हणून पैसा मिळविण्याचे साधन म्हणून केलेला नसला तरी त्यांच्याकडे आपले भविष्य जाणून घेण्यासाठी आपल्या जन्मकुंडल्या घेऊन सतत असंख्य लोक येत असतात. ज्योतिषावरील प्रेमापोटी व्रत म्हणून, आपण अशा लोकांचे मोफत भविष्य सांगतो व रोजचे त्यासाठी वेगळे दोन तास मी राखून ठेवले आहेत असे ते म्हणाले. हा क्रम गेली कित्येक वर्षे चालू असून आपल्या गिन्हाइकात महाराष्ट्राचे माजी मुख्यमंत्री कै. वसंतदादा पाटील व न्यायाधीश चंद्रचूड यांच्यासारख्या नामांकित व्यक्तीही असल्याचे त्यांनी सांगितले. आपल्या संग्रही पंचवीस हजार जन्मकुंडल्या असल्याचे सांगून त्यांनी आम्हाला आश्चर्यचकित केले. आम्ही त्यांच्याशी जवळ जवळ दोन तास ज्योतिष विषयावर चर्चा केली. या चर्चेत त्यांचा ज्योतिषाकडे पाहण्याचा दृष्टिकोन शुद्ध शास्त्रीय असल्याचे आमच्या निदर्शनास आले. माझ्याबरोबर माझे मित्र डॉ. सी. बी. देसाई हे असल्यामुळे त्यांनी ज्योतिषाचा वैद्यकशास्त्रीय दृष्टीने कसा अभ्यास करता येतो हेही सांगितले.

(याविषयी एक शिक्षणक्रम त्यांनी आखल्याचा वर उल्लेख आला आहेच.) आपले भविष्यकथन अचूक ठरल्याबद्दलची काही उदाहरणे त्यांनी सांगितली. त्यांच्या बोलण्यातून आत्मविश्वास ओसंडत होता. पण त्याचबरोबर ज्योतिषशास्त्राची शास्त्रीय परीक्षा व्हावी अशी त्यांची प्रामाणिक इच्छा व मानसिक तयारीही होती. शास्त्रज्ञास आवश्यक असलेला खुलेपणाही त्यांच्या ठिकाणी असल्याचे जाणवत होते. त्यांनी आम्हाला हवी असलेली सर्व माहिती पुरवलीच; पण आपल्या फाइलीतील महत्त्वाचे संदर्भ साहित्य, कात्रणे, लेख इ. स्वतःच्या खर्चाने झेरॉक्स करून आम्हाला पुरविले.

## ज्योतिषविषयक वादाची पार्श्वभूमी व स्वरूप

आता ज्योतिषविषयक वादाची सुरुवात कशी झाली हे पाहू, सांगली येथील काही कॉम्प्युटर व जाहिराती संघटनांतर्फे भावे नाट्यमंदिरात दि. २६ एप्रिल १९९२ रोजी 'ज्योतिष अंधश्रद्धा नव्हे, शास्त्र' या विषयावर श्री. गिरीश शहा यांचे एक जाहीर व्याख्यान आयोजित केले होते. या व्याख्यानाला अंनिसचे काही कार्यकर्ते मुद्दाम हजर राहिले व शहा यांना काही लेखी प्रश्न विचारले. त्यांच्या सर्व प्रश्नांची शहा यांनी उत्तरे दिली. पण शेवटचा प्रश्न महत्त्वाचा होता. त्याला लगेच उत्तर देणे शक्य नव्हते. कारण त्यात 'आम्ही तुम्हाला दहा व्यक्तीच्या पत्रिका देऊ. त्यावरून त्यांचे मृत्यू केव्हा होतील हे सांगू शकाल का?' असे विचारले होते. हे अर्थात समितीचे शहांना आव्हान होते. हे आव्हान शहा यांनी तत्काळ स्वीकारले. येथूनच आव्हान प्रक्रियेला सुरुवात झाली.

यानंतर समितीच्या लोकांनी शहांना घरी फोन करून आव्हान प्रक्रियेसंबंधी चर्चा करण्यास अमक्या वेळी येतो असे सांगावे, शहांनी त्यांची बराच वेळ वाट पाहावी, पण त्यांनी येऊच नये असे अनेकदा घडले. शेवटी शहा यांचे घरी या विषयावर चर्चा करण्याऐवजी दोघांनीही एका तिऱ्हाईत ठिकाणी ही चर्चा करावी असे ठरले. त्याप्रमाणे राममंदिराजवळील बी. बी. पाटील यांच्या निवासस्थानी दि. १७ मे रोजी म्हणजे शहांनी आव्हान स्वीकारल्यानंतर अंनिसनेच अनेकदा तारखा व वेळ देऊन तिनेच ते अनेकवेळा रद्द करून - तब्बल २१ दिवसांनी- एकदाची ही बैठक झाली. ही बैठक तीन तास चालली. या बैठकीस वृत्तपत्र प्रतिनिधीसह दोन्ही बाजूचे विसाहून अधिक लोक उपस्थित होते. या बैठकीत अंनिसने पुढीलप्रमाणे शहांना

आव्हान सादर केले अंनिसतर्फे २० पत्रिका वा जन्मवेळा शहांना दिल्या जातील. त्या आधारे दोन महिन्यात मुले व मुली यांची अपत्य संख्या, वैवाहिक स्थिती, आर्थिक स्थिती, संबंधित व्यक्ती जिवंत आहे की मृत याविषयी ८० टक्के अचूक निदान शहांनी करावे. मूळ सीलबंद लखोट्यातील उत्तरे सांगली येथे सर्वांसमक्ष उघडली जातील व शहा यांच्या उत्तराशी ८० टक्के जमल्यास दोन लाख रुपयांचे बक्षीस शहा यांना दिले जाईल.

हा मसुदा बैठकीत चर्चिला गेला व शहा यांनी काही आक्षेपासह तो मान्य केला. मात्र ही चाचणी घेण्यासाठी उभयमान्य न्यायाधीशांची स्वतंत्र पॅनेल निर्माण करण्याचा शहांनी आग्रह धरला. अंनिसला हे मान्य नव्हते. 'आव्हान आमचे न चाचणीही आमचीच असा समितीने आग्रह धरल्यामुळे निर्णय न होता बैठक संपली. पण नंतर शहांची ही मागणी समितीने मान्य केली. यामुळे शहा यांना माघार घेण्यास कोणतेच कारण राहणार नाही ही समितीची भूमिका असल्याचे समितीच्या एका पत्रकाद्वारे जाहीर करण्यात आले. यानंतर, वृत्तपत्रात अंनिसमार्फत ज्या उलट सुलट बातम्या दिल्या गेल्या, त्यामुळे निर्माण झालेला संभ्रम दूर करण्यासाठी श्री. शहा यांनी वृत्तपत्रांना एक निवेदन दिले. या निवेदनातील महत्त्वाचे मुद्दे शहा यांच्या शब्दातच देत आहे.

**'आमचेच खरे' अंनिसचे 'खरे' ध्येय धोरण ! -**

(१) १७ मेच्या बैठकीतील डॉ. नरेंद्र दाभोळकर व डॉ. प्रदीप पाटील यांचे वर्तन हुकूमशाहीचे होते. कारण अगोदर संमती घेऊनसुद्धा त्यांनी माझ्याबरोबर आलेल्या अनेक तज्ज्ञांना बोलण्यास विरोध करून त्यांना खाली बसावयास भाग पाडले. त्यांचा अपमान केला. बैठकीच्या नीतिनियमात हे बसते का?

(२) डॉ. राव यांच्यासारख्या उच्चविद्याविभूषित व ज्येष्ठ शास्त्रज्ञाबद्दल पोरकटपणाचे व असभ्यतेचे उद्गार काढून त्यांचा पाणउतारा करण्याचा निंद्य प्रयत्न समितीने केला. ज्यांची स्वतःची शैक्षणिक पात्रता सामान्य आहे, त्यांनी उद्धटपणे एखाद्या ज्येष्ठ शास्त्रज्ञाच्या शिक्षणाची चौकशी करणे हे कशाचे लक्षण आहे?

(३) आव्हान प्रक्रिया ही सर्वमान्य पंच समिती नेमून तिच्यामार्फत घेण्याचा रास्त व न्याय्य आग्रह मी जरूर धरला. परंतु वारंवार ही सूचना फेटाळून लावून डॉ. दाभोळकरांनी आपल्या हेकटपणाचे व आडमुठेपणाचे प्रदर्शन केले.

(४) चुकीच्या अशास्त्रीय प्रक्रियेचा आग्रह धरणे, ज्या प्रश्नांच्या उत्तरांना अनेक फाटे फुटतील असेच प्रश्न मुद्दाम निवडणे आणि ज्योतिष विषयाच्या आपल्या प्रचंड अज्ञानाचे प्रदर्शन करणे यातच समितीच्या उद्देशांची कल्पना आली. लग्न, पुत्र, व्यवसाय, मृत्यू या विषयावर मी मांडलेल्या सडेतोड मुद्यांवर खुलासा करणे त्यांना अशक्य झाले. विवाहाचा रजिस्ट्रारने दिलेला दाखला म्हणजेच लग्नाचा पुरावा आणि सात-बाराच्या उताऱ्यावर नाव असेल तोच शेतकरी असे कायदेशीर, परंतु व्यवहारशून्य युक्तिवाद त्यांनी केले. परंतु हे करीत असताना आपल्या बोलण्यातील फोलपणा त्यांच्या स्वतःच्या लक्षात आला असावा.

(५) बैठक संपल्याचे डॉ. दाभोळकरांनी स्वतःच एकतर्फी जाहीर केले आणि त्याचवेळी हा विषय संपला. त्यानंतर आजतागायत माझ्याशी कोणीही कोणत्याही मार्गाने संपर्क साधलेला नाही; मला पत्र दिल्याचे त्यांचे जाहीर निवेदन खोटे व लोकांची फसगत करणारे आहे.

(६) अधिकृत बैठक संपल्यावर, स्वतःचीच चूक उमगल्यावर आपली ताठर भूमिका सोडून, माघार घेऊन मानभावीपणे पंचमंडळ नेमण्याला समितीने मान्यता दिल्याचे वृत्तपत्रातून समजले. या बाबतीत पूर्वी रोज माझ्याशी संपर्क साधणारे समितीचे कार्यकर्ते नंतर मूग गिळून गप्प का बसले? बैठकीचा वृत्तांत दुसऱ्या दिवशी वृत्तपत्रात आल्यावर आपली उरली सुरली प्रतिमाही संपणार याचा पत्रकारांमार्फत अंदाज घेऊन भीतीग्रस्त झालेल्या व प्रसिद्धीस हपापलेल्या समितीने मला टाळून परस्पर वृत्तपत्राकडे धाव घेऊन, बातमीचे शीर्षक बदलून स्वतःची ढासळणारी प्रतिमा जिवंत ठेवण्याचा केविलवाणा प्रयत्न केला. राजकारण्यासच शोभेल अशी चाल खेळून सर्व सभ्य संकेतांचा भंग त्यांनी केला. अशा मंडळींच्या प्रामाणिकपणावर कोणी विश्वास ठेवावा?

(७) अनिसला सवंग प्रसिद्धी हवी आहे की सत्यशोधन ? कोणत्याही गावात, शहरात त्यांच्या समितीत ज्येष्ठ, श्रेष्ठ लोक का नाहीत? **त्यांचेच सभासद माझ्याकडे पत्रिका दाखविण्यासाठी का येतात? *** [4]श्रद्धा व अंधश्रद्धा यातील नेमका फरक लक्षात न घेता ही समिती परमेश्वर आणि ज्योतिष या विषयातील लोकांच्या श्रद्धेला हात लावण्याचा नको तो कारभार का करते? परमेश्वर आणि ज्योतिष यांना थोतांड मानणारी समिती जाहीर सभेत आम्ही देऊ ते आव्हान आमच्याच अटीवर मान्य करायला तयार आहे का? आपणच विद्वान असा समितीच्या सभासदांचा दावा आहे काय?

(८) अंनिसचे आव्हान एका भारदस्त व शास्त्रीय भूमिकेतून मी स्वीकारले होते. परंतु दुर्दैवाने मला आलेला समितीचा अनुभव खेदजनक आहे. 'आमचेच खरे' असा दुराग्रह धरणाऱ्या, सत्यशोधन बाजूलाच ठेवून राजकारण खेळणाऱ्या दुटप्पी व असमंजस लोकांशी यापुढे संपर्क ठेवणे नाही, असा निर्णय मी व माझ्या असंख्य चाहत्यांनी घेतला आहे. झाला तेवढा वेळेचा अपव्यय पुरे आहे.

या निवेदनातील शेवटच्या मुद्यातील वाक्यात शहा यांचा अंनिसविषयीचा भ्रमनिरास व कटू अनुभवाची जाणीव ठासून भरली आहे. अशा परिस्थितीत त्यांना पुन्हा चाचणीला तयार होण्यासाठी त्यांचे मन वळविण्याचा माझ्या मनातील विचार मनातच विरघळून गेला. अंनिसच्या कार्यकर्त्यांना मी भेटलो नाही हे वेगळे सांगण्याची गरज नाही.

## पुंगी- गाजराची की भोपळ्याची ?

---

[4] ४. 'अंनिस' चे कार्यकर्ते आपले भविष्य जाणण्यासाठी श्री. शहांचे कडे जातात यात कसलेच आश्चर्य नाही. कारण शेवटी ती माणसेच आहेत. अंधश्रद्धानिर्मूलन हा त्यांचा एक 'व्यवसाय' आहे. 'व्यवसाय' आणि खासगी जीवन यांच्यात विरोध असण्याचे कारण नाही. श्रद्धेचा जेथे प्रश्न येतो तेथे सुद्धा तो असण्याचे कारण नाही. कारण 'श्रद्धा' (किंवा अंधश्रद्धा हा सुद्धा काही लोकांचा 'व्यवसाय' बनू शकतो. बाजार कशाचाही मांडता येतो. जादूगार फसवणूक करण्याचा धंदा करत नाहीत काय? आणि आपल्या धंद्याचे गुपित ते कुणालाही सांगत नाहीत! 'अंनिस'च्या लोकांचेही तसेच आहे. ज्योतिषीकडेच काय, देव- देवर्षी कडेही ते खासगीत (गुप्तपणे) जातात एका 'अंनिस'च्या कार्यकर्त्यालाच जेव्हा भूत झपाटले तेव्हा तो देव-देवर्षी करू लागला ! पण गुप्तपणे (विज्ञान व चमत्कार या ग्रंथाचे १५ वे प्रकरण याविषयीच्या माहितीसाठी पाहा.)

घरी आल्यानंतर माझ्या एकदम लक्षात आले की ३० वर्षांपूर्वी पुण्याच्या 'सृष्टिज्ञान' या विज्ञानविषयक मासिकात मी फलज्योतिषावर एक लेख लिहिला होता. तो शोधून काढून वाचून काढला. आणि पुन्हा वाटू लागले को हा लेख पाठवला तर खुल्या मनाचे व विज्ञानवृत्तीचे शहा पुन्हा चाचणीला तयार होतील. निदान प्रयत्न करून पाहायला काय हरकत आहे? असा विचार करून खालील पत्ररूपी पुंगी तयार केली. ते पत्र व तो लेख शहा व अंनिसचे डॉ. दाभोळकर या दोघांनाही पाठवून दिले. वाचकांच्या माहितीसाठी दोन्ही येथे देत आहे.

सृष्टिज्ञान, एप्रिल १९६२ (वर्ष ३५ वे, अंक ४ था)

**मानवावर ग्रहांचा प्रभाव पडतो काय?**

**लेखक : श्री. अद्वयानंद गळतगे भ्र. ९९०२००२५८**

ग्रह व नक्षत्रे मानवी जीवनावर प्रभाव पाडत असतात असा समज फार प्राचीन



काळापासून जगातील जवळजवळ प्रत्येक वंशाच्या लोकात प्रचलित आहे. या प्रभावाचे स्वरूप मात्र अजून गुलदस्त्यातच आहे. खगोलशास्त्रज्ञ, ग्रह मानवावर असा काही परिणाम करतात हे मान्य करीत नाहीत. कारण तो परिणाम भौतिक नसतो. एखाद्या टेकडीवरून दगड खाली गडगडत येतो, तेव्हा गुरुत्वाकर्षणामुळे तो येतो हे मशहूरच आहे. एखादी व्यक्ती बडचा बेंडाच्या वशिल्याने वर चढते तेव्हा ती वशिल्याच्या शक्तीने वर चढते. गुरुत्वाकर्षण व वशिला या दोन्हीही 'शक्ती' असल्या तरी एक भौतिक आहे, दुसरी मानसिक आहे. यापैकी कुठल्या शक्तीचा प्रभाव ग्रह मानवावर पाडतात ?

ग्रहांचा भौतिक परिणाम पृथ्वीवर काही अंशी घडून येतो, नाही असे नाही. उदा. सूर्यामुळे पृथ्वीवर पाऊस पडतो. चंद्रामुळे समुद्राला भरत्या- ओहोटया येतात. इतर ग्रहांच्या गुरुत्वाकर्षणाचा पृथ्वीवर सूक्ष्म परिणाम होतो. पण हा परिणाम ज्योतिषांना अभिप्रेत नसतो. मानसिक परिणामही अभिप्रेत नसतो. (आणि असणे शक्य नाही. कारण मानसिक परिणाम दोन जिवंत वस्तूंमध्येच शक्य आहे. पण ग्रह निर्जीव

आहेत.) तेव्हा हा परिणाम 'गूढ' असला पाहिजे असे म्हणावे लागते. आपणाला भौतिक आणि मानसिक असे दोनच परिणाम माहीत आहेत. जो परिणाम भौतिकही नाही आणि मानसिकही नाही तो अनाकलनीय आणि म्हणून शास्त्रीय ज्ञानाच्या पलीकडचा आहे, असे म्हणणे भाग आहे.

ग्रहांचा 'गूढ' का होईना परिणाम होत नसेल कशावरून? अशी शंका उपस्थित करणे शक्य आहे. कारण विशिष्ट ग्रह व्यक्तीच्या जन्मकाली विशिष्ट स्थानात असले तर विशिष्ट परिणाम नेमके घडून येतात, असा निदान ज्योतिषांचा दावा आहे. आणि तो खरा आहे असे क्षणभर समजू. पण हा केवळ 'गूढ' परिणामाचाच खेळ आहे असे समजण्याचे कारण नाही. वास्तविकरीत्या तो परिणाम गूढ नाही इतकेच नव्हे तर तो परिणामसुद्धा नाही. ते कसे हे टोलेमी व कॅल्डीयन् खगोलशास्त्रज्ञांच्या उदाहरणांवरून कळून येईल. हे शास्त्रज्ञ पृथ्वी स्थिर असून इतर ग्रह पृथ्वीभोवती फिरत असतात असे समजत असत. ही समजूत चुकीची आहे हे आपणाला आता माहीत झाले आहे. पण तरीसुद्धा त्या काळी हे शास्त्रज्ञ ग्रहणाची वेळ बरोबर सांगत असत, हे कसे?

आपले भविष्य खरे ठरते हे पाहून आपली ग्रहांच्या भ्रमणाविषयीची कल्पना बरोबर असावी असे त्यांना वाटणे स्वाभाविक असले, तरी तसा त्यांनी दावा करणे योग्य होईल काय? त्याचप्रमाणे भविष्य वर्तवल्याप्रमाणे घटना घडून येतात म्हणून ग्रहच त्यांना कारणीभूत होतात असे म्हणणे कितपत योग्य होईल?

हे अधिक स्पष्ट होण्यासाठी एक उदाहरण घेऊ. एक मनुष्य दररोज शहरातील मनोऱ्याच्या घड्याळात सहाचे टोले पडताच आपल्या घरातून बाहेर पडतो असे समजू. या गोष्टीचे निरीक्षण करीत असलेल्या पण वेळेची कल्पना नसलेल्या एखाद्या व्यक्तीला ते सहाचे टोलेच त्या मनुष्याला बाहेर पडावयास लावतात असे वाटेल. एका अर्थाने हे खरे असले, तरी केवळ त्या टोल्यात हे सामर्थ्य आहे असे म्हणता येणार नाही. तसे असते तर त्या टोल्यांनी शहरातील प्रत्येक मनुष्याला घराबाहेर पडावयास लावले असते. म्हणजे त्या टोल्यांचा व त्या मनुष्याच्या घराबाहेर पडण्याचा संबंध 'कारण आणि परिणाम' असा नसून केवळ व्यवस्थेचा (System या आहे. अशा व्यवस्थेमुळेच टोलेमीला चुकीच्या समजुतीच्या आधारावरसुद्धा ग्रहणांची वेळ अचूकपणे सांगता आली. वरील उदाहरणात सहाचे टोले पडताच तो मनुष्य घराबाहेर

पडेल असे भविष्य सांगावे त्याप्रमाणे, अशीच व्यवस्था ग्रहांच्या जन्मकालीन स्थानाविषयी असणे असंभवनीय नाही.

खगोलशास्त्रात 'बोडचा नियम' या नावाने एक नियम प्रसिद्ध आहे. हा नियम अशी व्यवस्था असण्याच्या शक्यतेला पुष्टी देतो. या नियमाचे भौतिक अधिष्ठान शास्त्रज्ञांना सापडलेले नाही. या अर्थाने हा नियम आंधळा आहे. तरीसुद्धा त्याच्या आधारावर गुरू आणि मंगळ यांच्यामध्ये लहान ग्रह असावेत असे भविष्य वर्तविले गेले आणि ते खरेही ठरले ! आंधळा नियम खरा ठरला तर तो एका विशिष्ट व्यवस्थेचा पुरावा म्हणता येईल. अशाच प्रकारे ज्योतिषविषयक आंधळ्या नियमाने घटना खऱ्या ठरत असतील, तर तेही एका विशिष्ट व्यवस्थेमुळेच होय, असे का म्हणू नये ?

फलज्योतिषविषयीचा हा एक दृष्टिकोण आहे. तो ज्योतिषांना पटणार नाही. कारण फलज्योतिष हे शास्त्र आहे असे ते म्हणतात. ते शास्त्र आहे की कला, हा केवळ शाब्दिक वाद आहे. अध्यात्म हे गूढ असले तरी तेही एक शास्त्रच आहे असे म्हणतात. चोरी करणे हेही एक शास्त्रच आहे ! शास्त्र नाही कोणते? पण शास्त्राच्या नावाखाली मान्यता मिळविण्याचा प्रयत्न करण्यापेक्षा फलज्योतिषाचे खरे स्वरूप उघडपणे मान्य करून ज्योतिष्यांनी आपला धंदा केला, तर ते त्यांच्याच हिताचे आहे असे वाटते ! खासगीरीत्या त्यांनी फलज्योतिष हे शास्त्र आहे असे बेशक समजावे. पण जाहीररीत्या जेव्हा त्याची चर्चा करण्याची वेळ येते तेव्हा त्यांनी असे सांगून टाकावे, "ग्रह मानवावर जो प्रभाव पाडतात त्याचे स्वरूप आम्हाला माहीत नाही, कदाचित तो प्रभाव भासमान असेल. मुळात ते कसलाच प्रभाव पाडीत नसतील किंवा ग्रहांच्या स्थानावरून भविष्य खरे ठरते हा विश्वामधील एक संकेत असेल. त्या संकेताचे काही नियम आहेत. ते नियम आम्ही शोधून काढले असून त्यांना कसलाही तर्कशास्त्रीय आधार नाही. ज्यांना भविष्य जाणून घ्यावयाचे आहे त्यांनी या संकेतावर विश्वास ठेवावा. इतरांनी आमच्या वाटेला जाऊ नये !"

**टीप:** (१९९३ साली जोडलेली)- बोडचा आंधळा नियम मंगळ आणि गुरू यांच्यामध्ये सापडलेल्या अनेक लहान ग्रहामुळे खरा ठरल्याचे वरील लेखात ३० वर्षांपूर्वी म्हटले आहे. पुन्हा तो खरा ठरल्याचे प्ल्युटोच्या पलीकडे १० वा व ११ वा असे दोन नवीन ग्रह सूर्यापासून अनुक्रमे ७ अब्ज ८० कोटी किलोमीटर व १५ अब्ज

कि. मी. अंतरावर प्रत्यक्ष खगोलशास्त्रांना सापडल्याने सिद्ध झाले आहे. हे ग्रह अमक्या अंतरावर असले पाहिजेत असे बोडच्या नियमाच्या आधारे भारतीय शास्त्रज्ञ डॉ. रावळ यांनी १९७८ साली भाकीत केले होते; आणि प्रत्यक्षात ते अमेरिकन शास्त्रज्ञांना १९८७ व १९९२ साली त्या अंतरावरच सापडले आणि अशा रीतीने '*बोडचा नियम पुन्हा खरा ठरला.

बोडचा नियम

अठराव्या शतकामध्ये जर्मन खगोलशास्त्रज्ञ जोहान बोड याने सूर्यापासून ग्रहांच्या अनुक्रमे अंतरावर एक समीकरण तयार केले, त्यालाच 'बोडचा नियम' असे म्हणतात. यामध्ये सूर्याजवळील सुरवातीचा ग्रह (०) शून्य तर त्यानंतरचा ग्रह ३ व त्यानंतरची प्रत्येक संख्या आधीच्या संख्येच्या दुपटीने ७६८ पर्यंत वाढवत न्यायची, मग त्या संख्येमध्ये ४ ही संख्या मिळवायची व येणाऱ्या संख्येला १० ने भाग द्यायचा व शेवटी जे उत्तर येईल ती संख्या त्या ग्रहाचे खगोलीय एककामध्ये सूर्यापासूनचे अंतर असेल.बोडचा नियम जेव्हा प्रसिद्ध झाला तेव्हा खगोलशास्त्रज्ञांना असे वाटले की नक्कीच या नियमानुसार मंगळ व गुरू यांच्यामध्ये एखादा ग्रह असावा.

---

**प्राचार्य अद्वयानंद गळतगे** (निवृत्त)

भोज (बेळगांव), कर्नाटक

दि. २६.१०.१९९२

प्रति,

(१) **डॉ. नरेंद्र दाभोळकर**

कार्याध्यक्ष, अंधश्रद्धा निर्मूलन समिती, सातारा.

(२) **श्री. गिरीश शहा**

संचालक, ऑल इंडिया ॲस्ट्रॉलॉजिकल इन्स्टिट्यूट, दिल्ली, मु. सांगली यांसी,

स. न. वि. वि.

आपणा दोघांस हे पत्र संयुक्तरीत्या लिहिण्याचा उद्देश म्हणजे २६ एप्रिल १९९२ ते २६ मे ९२ असा संपूर्ण महिनाभर (प्रथम समक्ष व नंतर वर्तमानपत्रातून) 'ज्योतिष हे शास्त्र आहे काय?' या विषयावर आपणात झालेला वाद हा केवळ विवाद (किंवा वितंडवाद) म्हणून इतिहास जमा न होता तो संवाद (किंवा सुसंवाद) म्हणून (म्हणजे सत्यशोधन घडवून आणणारा वाद म्हणून) जनतेसमोर यावा व इतके दिवस या गोष्टीवर खर्च केलेले श्रम, वेळ व पैसा हे सत्कारणी लागावेत सार्थकी ठरावेत या सद्हेतूने व सत्यशोधनाच्या वैज्ञानिक प्रेरणेतून आपले उभयतामधील **तुटलेले संबंध पुन्हा सांधता जोडता आले तर पाहावे,** यासाठी केलेला हा माझा एक अल्प प्रयत्न आहे. याला कितपत यश येते हे अर्थात आपणा दोषांवरच आपल्या प्रतिसादावरच सर्वस्थी अवलंबून राहील हे उघड आहे. -

याविषयी प्रथम दोन प्रश्न उद्भवतात

(१) या वादात पडण्याचे मला व्यक्तिशः काय कारण? किंवा काय अधिकार ?

(२) विवादात परिणत झालेला हा वाद सुसंवादात रूपांतरित करण्याची आशा मी का बाळगतो ?

- प्रथम पहिल्या प्रश्नाचे उत्तर या वादात तटस्थ भूमिका उत्तम रीतीने केवळ मीच बजावू शकतो, असा माझा विश्वास आहे. याला पुरावा म्हणजे सोबत जोडलेला माझा 'सृष्टिज्ञान' या विज्ञानाला वाहिलेल्या मासिकात प्रसिद्ध झालेला माझा 'मानवावर ग्रहांचा प्रभाव पडतो काय?' हा वैज्ञानिक लेख. ह्या लेखात अंनिस प्रमाणेच मी सुद्धा ज्योतिष हे शास्त्र नाही असे माझे मत मांडले आहे, तेव्हा श्री. शहा यांना या वादाचा शास्त्रीय भूमिकेतून पाठपुरावा करून ते खोडून काढण्याची संधी मिळणार आहे. उलट ज्योतिषींनी ग्रह व मानव यांच्यातील संबंधाविषयी संकेतसूचक असे काही नियम शोधून काढले आहेत, असेही माझे आणखी एक मत मांडले आहे.

हे माझे मत शहा यांना अनुकूल व 'अंनिस'ला विरोधी असल्याने ते खोटे ठरविण्याची संधी 'अंनिस'ला या वादाचा पाठपुरावा करून मिळणार आहे. अर्थात, माझी ही दोन्ही मते (अनुक्रमे ) शहा व 'अंनिस' या दोघांना बिनबुडाची वाटतील यात शंका नाही. म्हणून माझे दोघांनाही आव्हान आहे की ती बिनबुडाची असल्याचे दोघांनीही सिद्ध करावे व माझे त्यासाठी ठेवलेले २००० रुपयांचे बक्षीस मिळवावे. या वादाचा शास्त्रीय निकषांवर निकाल लागला तर माझी दोन्ही मते खोटी ठरतील किंवा एक खरे व एक खोटे किंवा दोन्ही खरी ठरतील. दोन्ही खोटी ठरली तर 'अंनिस'चा विजय होईल व तिला माझे २००० रु. मिळतील. (शहांचेही २००० रु. मिळतील.) त्यातील एक खोटे ठरले तर 'अंनिस'चा पराभव होईल व शहा यांना 'अंनिस'चे २ लाख रुपये मिळतील. माझे २००० रुपयेसुद्धा शहांना मिळतील. पण शहांना माझे २००० रुपये मिळावयाचे झाल्यास म्हणजे माझा पराभव करावयाचा झाल्यास - त्यांना फलज्योतिषाचे भविष्यकथन खरे ठरते एवढेच सिद्ध करून चालणार नाही, ('अंनिस' मात्र एवढे सिद्ध केल्यास ज्योतिष हे शास्त्र मानायला तयार आहे. पण मी नाही.) तर ज्योतिष हे शास्त्र आहे हेही शास्त्राची (Science की सर्वमान्य व्याख्या करून ज्योतिष त्यात कसे असते हे सोदाहरण दाखवून देऊन सिद्ध करावे लागेल. त्यांना तसे सिद्ध करता आले नाही तर त्यांना ज्योतिषाचा छंद म्हणून व्यवसाय चालू ठेवण्याचा व्यावहारिक अधिकार आहे हे मी मान्य करीन. पण त्यांना शास्त्र म्हणून त्याचा व्यवसाय करण्याचा (शास्त्रीय) अधिकार राहणार नाही. व तसे त्यांना जाहीर निवेदन द्यावे लागेल. (माझे २००० रुपये त्यांना अर्थातच मिळणार नाहीत.) आणि माझी दोन्ही मते खरी ठरली तर माझे (व शहांचेही) २०००रु. 'अंनिस'ला मिळणार नाहीतच. पण शहांना मात्र 'अंनिस'चे २ लाख रुपये मिळतील.

आता दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर मला 'अंनिस' व शहा या दोघांनीही या वादाचा शास्त्रीय निकषांवर निकाल लावण्यासाठी व पुन्हा संबंध प्रस्थापित करण्यासाठी एकत्र यावे अशी त्यांना आग्रहाची व कळकळीची विनंती अशासाठी करावीशी वाटते, की दोघांनाही ज्योतिष हे शास्त्र आहे की नाही हे जनतेला कळावे (एकाला आहे असे कळावे व दुसऱ्याला नाही असे) याविषयी सारखीच आस्था वाटते. याला पुरावा :

शहांनी "आव्हान स्वीकारल्याबद्दल समितीने एका प्रसिद्धी पत्रकाद्वारे आनंद व्यक्त केला आहे. " (**पुढारी** ३०.४.९२ )

"शहा हे भारतातील पहिले ज्योतिषी आहेत की ज्यांनी समितीचे २ लाख रुपयांचे आव्हान स्वीकारले आहे, याचाही समितीस आनंद होत आहे. " (**केसरी** ३.५.९२) "अंनिसचे आव्हान स्वीकारले अशा आशयाचे एक निवेदन इन्स्टिट्यूट ऑफ अॅस्ट्रॉलॉजीचे संचालक श्री. गिरीश शहा यांनी काढले आहे. या समितीचे आव्हान स्वीकारण्यास आपणास आनंद होतो असे त्यांनी प्रतिपादन केले आहे." (**पुढारी** २९.४.९२) अशा रीतीने जे आव्हान स्वीकारल्याबद्दल दोघांनाही (अंनिस व शहा यांना) आनंद होतो ते आव्हान फुसके ठरू नये अशी दोघांचीही (देणाऱ्याची व ते स्वीकारण्याची धारणा असणार हे गृहीतच आहे. (म्हणजे हे आव्हान फुसके ठरले तर दोघांनाही दुःख होणार हे गृहीतच आहे.) मग अडले कुठे? प्रथम स्वतंत्र पंचमंडळ नेमण्याच्या प्रश्नावर अडले होते हे खरे आहे. पण अनिसने स्वतंत्र पंचमंडळ (सहा जणांचे) नेमण्याची शहा यांची मागणी नंतर मान्य केली आहे. मग पुन्हा कुठे अडले? असे मंडळ नेमण्याची शहांची मागणी आम्हाला मान्य आहे असे अनिसने शहा यांना लेखी (पत्राने) कळवावयास हवे होते. २२ मेच्या **सकाळ** मध्ये "समितीतर्फे तसे पत्रही दिले आहे." असे म्हटले आहे हे खरे. पण २५ मेव्या **नवसंदेश**मध्ये व २६ मेच्या **अग्रदूत**मध्ये प्रसिद्ध झालेल्या पत्रकात श्री. शहा म्हणतात की १७ मेची बैठक झाल्यानंतर आपल्याशी कोणीही कोणत्याही मार्गाने संपर्क साधलेला नाही. "**मला पत्र दिल्याचे त्यांचे जाहीर निवेदन खोटे व लोकांची फसवणूक करणारे आहे.**" आता येथे कोण खरे बोलत आहे व कोण खोटे बोलत आहे बरे? श्री. शहा हे व्यक्तिगत बोलतात, व **अग्रदूत** मधील संपूर्ण पत्रक त्यांच्या स्वतःच्या शब्दात आहे. या उलट **सकाळ**मधील बातमीमध्ये अंनिसच्या सांगली शाखेचा निर्वाळा दिला आहे. पत्र दिल्याबद्दल कोणाही व्यक्तीचा उल्लेख नाही. म्हणून शहांचे विधान हे वैयक्तिक जबाबदारीचे विधान म्हणून स्वीकारावे लागते.

पण अंनिस प्रामाणिक आहे असे गृहीत धरू; (किंवा अंनिसला संशयाचा फायदा देऊ.) व तसे पत्र शहांना पाठविले होते, पण ते त्यांना पोचलेच नाही असे समजू. असे जर असेल तर श्री. शहा व अंनिस यांच्यामध्ये पुन्हा संबंध प्रस्थापित

करण्याचा मार्ग मोकळा होतो; या बाबतीत प्रस्तुत पत्रलेखक पुढाकार घेण्यास तयार आहे. याचा आशावाद पुढील दोन गोष्टींवर आधारला आहे.

(१) श्री. शहा यांनी आपल्या पत्रकात अनिसच्या कार्यकर्त्यांना 'हुकूमशहा', 'हेकट', 'आडमुठे' अशा शब्दांनी संबोधले असले तरी त्यांचा मुख्य भर जनतेच्या प्रतिसादावर असल्यामुळे जनतेला ज्योतिषविषयक सत्य कळावे असा त्यांचा आग्रह आहे. म्हणून ते अंनिसच्या कार्यकर्त्यांच्या स्वभावातील उपर्युक्त दोषांकडे (ते दोष खरे समजले तर) दुर्लक्ष करतील असा भरवसा वाटतो. ज्योतिषावरील प्रेमापोटी व कशाचीही अपेक्षा न धरता जनतेची सेवा म्हणून ज्योतिष हे व्रत म्हणून स्वीकारणाऱ्याकडून थोडी तडजोड व सोशिकपणा यांची अपेक्षा केली तर ती अनाठायी ठरणार नाही. याविषयी अंनिसचे कार्यकर्तेही थोडा सोशिकपणा दाखवतील असा विश्वास वाटतो. (तडजोड तर स्वतंत्र पंचमंडळ मान्य करून त्यांनी केलीच आहे व त्याबद्दल ते धन्यवादास पात्र आहेतच.) कारण 'जुने काही काढू नका' असे डॉ. दाभोळकरच वरचेवर म्हणतात असे शहांनी आपल्या पत्रकात म्हटले आहे. (२६ मेचा **अग्रदूत**) तेव्हा दोन्ही पक्ष शास्त्रीय सत्यावरील निष्ठेची किंमत म्हणून 'जुने काही काढू नये हा शब्द वा नियम पाळतील असे समजावयास हरकत नाही. (त्यांनी तो नाही पाळला तर त्यांची शास्त्रीय सत्यावरील प्रेम व निष्ठा बेगडी असल्याचे सिद्ध होईल. )

(२) 'ज्योतिष हे शास्त्र आहे काय?' याविषयीचे अंनिसने सात वर्षांपूर्वी दिलेले आव्हान भारतात आजतागायत कोणीही स्वीकारले नाही. ते स्वीकारणारे "शहा हे भारतातील पहिले ज्योतिषी आहेत.", आणि त्यामुळे जनतेला "ज्योतिष हे थोतांड कसे आहे हे प्रत्यक्ष अनुभवण्याची संधी अनिसतर्फे मिळणार असून ही संधी समितीला मिळाली आहे." असे अनिसचे सांगली शाखाध्यक्ष डॉ. प्रदीप पाटील यांनी म्हटले आहे. (**केसरी** ३ मे) ही संधी समिती सहजासहजी दवडणार नाही. दवडली तर जनतेला व समितीलाही पुन्हा अशी संधी मिळणार नाही व हे 'थोतांड' असेच चालू राहील. समितीला हे कसे सहन होईल हे कळणे कठीण आहे. तेव्हा हे थोतांड आहे अशी अंनिसच्या कार्यकर्त्यांची खात्री असेल (आणि ती आहेच) तर ते थोतांड उघड करण्यासाठी ते थोड्या तडजोडीला तयार होतील अशी अपेक्षा आहे. ही तडजोड

उभयतांच्या भेटीची वेळ, जागा यांसारख्या किरकोळ गोष्टीविषयी असेल. वैज्ञानिक कसोटयांविषयी कसलीही तडजोड होणार नाही. सुदैवाने स्वतंत्र पंचमंडळ ठरवतील त्था वैज्ञानिक कसोटयांना सामोरे जाण्याची शहांनी तयारी दर्शवली आहे. **(राष्ट्रशक्ती** १८ मे) (या कसोट्या केवळ वैज्ञानिक व व्यावहारिक (व्यवहार्यता) दृष्टी ठेवून शास्त्रज्ञांचे पंच मंडळ तयार करील.) अंनिसचीही त्याला तयारी असावी. आणि ती असणारच. कारण 'त्यामुळे (स्वतंत्र पंचमंडळ नेमल्यामुळे) शहा यांना माघार घेण्यास कोणतेच कारण राहू नये.' ही 'समितीची भूमिका' साध्य होणार पार पडणार (**केसरी** १८ मे, **नवसंदेश** १८ मे) याविषयी अंनिसने माघार घेतली तर पुन्हा ज्योतिष हे थोतांड असल्याचे सिद्ध करण्याची संधी तिला मिळणार नाही हे तर झालेच, (कारण त्यांनी एकदा आपला हेकटपणा दाखवल्यामुळे पुन्हा त्यांचे आव्हान कोणी स्वीकारणार नाही.) पण ज्योतिष थोतांड असल्याची त्यांची ही एक पोकळ बडबड असल्याचेही सिद्ध होऊन त्यांची पत व विश्वासार्हता नष्ट होईल. या गोष्टी समितीच्या कार्यकर्त्यांना मुळीच रुचणार नाहीत असा माझा विश्वास आहे. म्हणूनच समेटाचे प्रयत्न करण्याचे हे पत्राद्वारे पाऊल मी टाकले आहे. 'अंनिसच्या लोकांशी पुन्हा संपर्क ठेवणे नाही असा निर्णय शहा व त्यांच्या चाहत्यांनी घेतला असला तरी ज्योतिष विषयावरील ज्या प्रेमामुळे ते प्रथम चाचणीला तयार झाले, त्या प्रेमापोटीच पुन्हा एकदा ते तयार होतील अशी मी आशा करतो. आईचे आपल्या मुलावरील प्रेम कसोटीच्या क्षणीच खरे असल्याचे सिद्ध होते. आणि खरे प्रेम करणारी स्त्री (खरी आई) मुलावरील कसोटीच्या क्षणी कधीच पळ काढीत नाही. शहांच्या ज्योतिषावरील प्रेमाचा हा कसोटीचा क्षण आहे असे त्यांनी समजावे व पुन्हा चाचणीला तयार व्हावे अशी मी त्यांना नम्रपणे आग्रहाची विनंती करतो. आपापल्या संघटनेचे संघाचे प्रमुख म्हणून आपण दोघेही माझ्या - या पत्राला अनुकूल होकारार्थी उत्तर द्याल अशी मी आशा करतो. आपले उत्तर **रजिस्टर्ड पोस्टाने** शक्यतो पोस्ट कार्डाने वा अंतर्देशीय पत्राने कळवावे अशी विनंती आहे. अनुकूल उत्तर येताच मी आपल्या वैयक्तिक भेटी घेईन व आपल्या उभयतांच्या सल्ल्यानुसार पुढील पाऊले टाकीन. माझी मध्यस्थी आपणाला नको असेल, तरी तसे कळवण्याची कृपा करावी. कुठल्याही मध्यस्थीचा काहीही उपयोग होणार नाही असे आपणाला वाटत असेल तरी तसेही कळवावे, पण त्याची **समर्पक कारणे** द्यावीत; व आपण स्वतःच पुढाकार घ्यावा. **यातले आपण**

**काहीच केले नाही** व माझ्या पत्राची आपण उपेक्षा केली आपणाकडून काहीच उत्तर आले नाही तर मी माझे स्वतःचे - निष्कर्ष काढण्यास व ते प्रसिद्ध करण्यास मोकळा असेन. हे सर्व मी शहांच्या स्वतंत्र पंचमंडळाची मागणी अंनिसला मान्य असल्याचे "**पत्र समितीतर्फे शहांना दिले आहे**" या २२ मेच्या **सकाळ**मधील बातमीवर विसंबून लिहिले आहे. (म्हणजे शहांची ही पंचमंडळाची मागणी अंनिसला मान्य असल्याचे नंतर अंनिसने काढलेले पत्रक प्रामाणिक हेतूने काढले आहे या समजुतीखाली लिहिले आहे.) शेवटी हे पत्र ज्योतिषविषयी जिव्हाळा वाटणारा एक सामान्य मनुष्य म्हणून मी लिहिले आहे असे निदान समजावे. तसेच माझा हा दृष्टिकोनही माझा एकट्याचा नसून असंख्य लोकांचा आहे त्यांचे प्रतिनिधित्व मी करीत आहे असेही समजावे, या दृष्टीने तरी माझ्या पत्राची आपण उपेक्षा करणार नाही असा भरवसा मी बाळगून आहे.

**सोबत :** १ लेख (मानवावर ग्रहांचा प्रभाव पडतो काय ?)

कळावे,

आपला विश्वासू

**अद्वयानंद गळतगे**

ता. क. ज्योतिषविषयक माझा जिव्हाळा ३० वर्षांपूर्वी या विषयावर मी एक वैज्ञानिक लेख लिहिला आहे, व ज्योतिष हे शास्त्र असल्याचे सिद्ध करणाऱ्यास २००० रु. चे बक्षिस ठेवले आहे या दोन गोष्टींवरून स्पष्ट व्हावयास हरकत नाही. माझी या लेखात व्यक्त केलेली मते या ३० वर्षात बदलली असल्याचे लेखी पुराव्याच्या आधारे सिद्ध करणाऱ्यास मी वेगळे २००० रु. बक्षिस देण्यास तयार आहे. माझ्या २०००+२००० रु. बक्षिसासंबधीचा करार १० रु. च्या स्टॅपवर लिहून देण्यास व त्याप्रमाणे पंचमंडळाकडे ते पैसे आगाऊ देण्यास मी तयार आहे. याची प्रत डॉ. प्रदीप पाटील, 'अंनिस' सांगली, यांना पाठवली आहे.

**पुंगी वाजली पण कशाची?**

डॉ. दाभोळकरांना रजिस्टर ए. डी. करून पाठविलेल्या पत्राची पोस्टाची पोच पावती आली. पण आजतागायत त्यांचे कसलेच उत्तर आलेले नाही. शहा यांनी मात्र

तात्काळ उत्तर लिहिले आहे. पण ते उत्तर 'परगावी जात असल्यामुळे परत आल्यावर सविस्तर उत्तर पाठवीन' असे आहे. पण त्यांचे 'सविस्तर उत्तर' आजतागायत आलेले नाही. आणि यापुढे येईल असे वाटत नाही. त्यांचे हे उत्तर का आले नाही याची शेवटी चर्चा करू. डॉ. दाभोळकरांनी का उत्तर पाठविले नाही याविषयी काही शंका वाचकांच्या मनात निर्माण होणे शक्य आहे. त्यांचे प्रथम निरसन केले पाहिजे.

एक शंका अशी, की दाभोळकरांच्या दृष्टीने हा ज्योतिषविषयक वाद होऊन पाच महिने उलटले आहेत, त्यातील रस निघून गेला आहे. माझा प्रयत्न शिळ्या कढीला ऊत आणण्याचा आहे. याला एकाच वाक्यात (उलट प्रश्न करून) उत्तर देता येईल : 'सत्यशोधन शिळे होते हा शोध केव्हा लागला ?"

दुसरी शंका अशी, की मी उत्तर देण्याच्या लायकीचा माणूस नाही. याला उत्तर असे, की ज्योतिष विषयाचा जिव्हाळा वाटणाऱ्या असंख्य लोकांचे प्रतिनिधित्व करणारा सामान्य मनुष्य म्हणून मी पत्र लिहिले असल्याचे स्पष्ट म्हटले आहे. अंनिस सामान्य माणसासाठी नसल्यास गोष्ट वेगळी !

या दोन संभाव्य शंकांचे निरसन केल्यानंतर मला उत्तर न लिहिण्याचे एकच कारण ठरते अंनिस या चाचणीला स्वतच्या काही खासगी कारणासाठी : तयार नाही. पण अंनिस ही खासगी संघटना नसल्याने हे कारण स्वीकारता येत नाही. शेवटी न टाळता येणारा एकच निष्कर्ष निघतो. तो म्हणजे अंनिसने या वादातून सरळ पळ काढला आहे! आणि हाच निष्कर्ष शंभर टक्के बरोबर आहे. कारण अशा प्रकारे पळ काढण्याचा तिचा हा पहिलाच प्रसंग नाही. स्वतःचे अस्तित्व टिकविण्यासाठी तिला असे अधून मधून पळावे लागते पण या वेळच्या पळण्यात अंनिसने एक विक्रम केला आहे. मी लेखाच्या प्रारंभी म्हटले आहे, की ज्योतिषशास्त्र हा असा विषय आहे की ज्यातून असंभाव्य अटी घालून पळून जाण्याचा अंनिसचा नेहमीचा मार्ग खुंटतो. (या कारणासाठीच मी या वादात लक्ष घालण्याचे ठरविले होते.) पण पळून जाणे अशक्य असलेल्या ज्योतिषशास्त्राच्या आव्हान प्रक्रियेतूनही अंनिस पळाली आहे! कसल्याही साखळदंडाच्या बंधनातून चलाखीने (जादूने) हुदिनी हा जगप्रसिद्ध जादूगार निसटत असे. आणि यातच सर्वांच्या डोळ्यात धूळ फेकणे यातच खरी 'जादू' असते! अंनिसने 'शहांची स्वतंत्र पंचमंडळ नेमण्याची मागणी मान्य केली आहे' असे खोटे वृत्त

प्रसिद्धीस देऊन सर्वांच्या डोळ्यात धूळ फेकून, निसटून जाण्याची 'जादू' केली आहे. पण त्यामुळे मी पूर्वी काढलेले निष्कर्ष दुप्पट जोमाने बळकट होतात. हे निष्कर्ष म्हणजे

( १ ) अंनिसचा व विज्ञानाचा काही संबंध नाही. वैज्ञानिक सत्यशोधन हे अंनिसचे उद्दिष्ट नसून विशिष्ट (राजकीय) मतप्रचार हे तिचे उद्दिष्ट आहे. त्यासाठी जरूर पडली तर असत्याचा प्रचार तोही विज्ञानाच्या नावाखाली बेधडक व - बिनदिक्कतपणे करते. (हिलाच मी तिची वैज्ञानिक बुवाबाजी म्हणतो.)

(२) सवंग वृत्तपत्रीय प्रसिद्धी मिळविणे, ही या समितीच्या स्थापनेमागील प्रेरणा आहे. समितीच्या लोकांच्या सर्व हालचाली या एकमेव प्रेरणेने निर्धारित होतात.[5]

(३) सुसंस्कृतपणाचे व सभ्यतेचे सर्व संकेत गुंडाळून ठेवणे, हीच या लोकांची सामाजिक वर्तणुकीची 'भूषणावह' प्रथा आहे.

(४) या लोकांची गंभीरपणे दखल घेऊन बुद्धी, श्रम, वेळ इ. खर्च करणे हा निव्वळ अपव्यय आहे.

श्री. शहांनी चाचणीला तयार न होऊन बुद्धी, श्रम, वेळ इ. गोष्टींचा अधिक अपव्यय न करण्यातच शहाणपणा दाखवला असे म्हटले पाहिजे. मला सविस्तर उत्तर लिहिण्यामध्ये त्यांना मला हेच पटवून सांगावयाचे असावे. किंवा 'ज्योतिष हे शास्त्र नाही' हे माझे म्हणणे खोडून काढण्याचाही मला सविस्तर उत्तर लिहिण्यामध्ये त्यांचा उद्देश असावा. पण त्यांचे हे सविस्तर उत्तर आलेले नसल्यामुळे त्यांना हे जमलेले नसावे असाही तर्क बांधता येतो, काही असो, त्यांना अंनिसच्या लोकांचा आत्यंतिक वीट आला आहे एवढे निश्चित !

अंनिसच्या लोकांचा एका बाबतीत मात्र कोणी हात धरू शकत नाही हे मान्य केले पाहिजे. ती बाब म्हणजे 'जादू' । अंनिसला अवगत असलेल्या अनेक जादूच्या

---

5 ५. अंधश्रद्धा निर्मूलनाच्या गोंडस नावाखाली पुस्तके लिहिण्याचे प्रसिद्धीचे व अर्थप्राप्तीचे 'समाजकार्य' करणे हा हेतूही यात अर्थातच अनुस्यूत आहे.

प्रयोगांपैकी 'न वाजणाऱ्या गाजराची पुंगी ऐकवणे' व 'निसटणे अशक्य असलेल्या बंधनातूनही निसटणे' हे प्रयोग खास अंनिसचे आहेत कोण म्हणतो 'जादू' ने 'समाज प्रबोधन' होत नाही म्हणून?

टीप: (१) प्रस्तुत प्रकरणातील मुख्य पात्र डॉ. प्रदीप पाटील यांच्या आणखी एका 'जादू'च्या प्रयोगाची येथे माहिती देणे अप्रस्तुत ठरणार नाही. या 'जादू'च्या प्रयोगाचे नाव आहे 'स्टेजवरून अदृश्य होणे' (Vanishing Trick). कोल्हापूरच्या दै. पुढारीच्या १६ मे १९९१ च्या अंकात या प्रयोगाची माहिती आली आहे.

**ढोंगी 'अंनिस' उपडी पडली**

ता. ५.४.९१ रोजी कचरनाथ बाबांचे भाविकांनी बाबांचे शिष्य गुरुवर्य पू. बबन बापू यांनी तासगाव येथे भव्य मिरवणूक काढली. मेळावा घेतला. व विभूती प्रदान करण्याचा कार्यक्रम घेतला. जो नाथपंथीय 'विभूतमय प्रसाद' देण्याचा ७०० सर्वाहून जुना प्रघात आहे, स्थाकरता भाविक कसलीही चीजवस्तू अथवा पैसे प. पू. बापूंना देत नाहीत. किंवा कसलीही आर्थिक देवाण-घेवाण नाही. यात अंधश्रद्धा अशी काही नाही.




'अंनिस' लोकांनी हिंदू-धर्मीयांच्या भावनांना तडा लावण्याचा प्रकार करून २००० लोकांसमोर बापूंनी शरणागती पत्करली असे धादांत खोटे वृत्त ता. २८.४.९१

रोजी **केसरी** वृत्तपत्रात दिले. याबाबत 'अंनिस' चे डॉ. प्रदीप पाटील यांना भाविकांनी ५.५.९१ रोजी विचारले असता मी ती बातमी दिली नाही, असे स्पष्ट सांगली येथे सांगितले. मात्र **केसरी**चे सांगलीचे संपादकांनी डॉ. प्रदीप पाटील यांनी लेखी बातमी दिली असे स्पष्ट सांगितले. व यासंबंधी त्यांना सांगून ११.५.९१ रोजी **केसरी**त खुलासा प्रसिद्ध केला आहे. यावरून 'अंनिस'ला खोटी प्रसिद्धी मिळवायची आहे हे स्पष्ट झाले.

**दरबार चालक**

**जनकल्याण करनाथ दरबार**

वस्तुतःवरील प्रकरणात अंनिसची तीन दुष्कृत्ये उघडी पडली आहेत.

(१) हिंदूंच्या धार्मिक भावना दुखवणे, (२) धादांत खोटा प्रचार करणे व (३) कसेही करून (वाममार्गाने) सवंग वृत्तपत्रीय प्रसिद्धी मिळविणे. याला कोणी 'दुष्कृत्ये' म्हणतील. पण हेच 'अंनिसचे' 'समाजप्रबोधन' होय ! आणि हे 'समाज प्रबोधन' वरील प्रकारच्या (वाटेल तेव्हा गुप्त होणे व प्रकट होणे यासारख्या) प्रयोगानेच होऊ शकते आणि ती 'जादू' केवळ अंनिसच्या डॉक्टर लोकांनाच अवगत आहे !

(२) श्री. गिरीश शहा यांनी अंनिसचे लोक किरकोळ ज्योतिषांना घेराव घालून, त्यांना घाबरवून व दमदाटीच्या बळावर ज्योतिषशास्त्र खोटे असल्याचे त्यांच्याकडून कसे वदवून घेतात व त्यांना धंदा बंद करायला लावून प्रसिद्धी मिळवतात, याची एकदोन उदाहरणे आम्हाला सांगितली. जेव्हा मातब्बर ज्योतिषी भेटतो तेव्हा मात्र आपली अब्रू वाचवण्यासाठी कसे खोटे निमित्त शोधून धूम ठोकतात हे आपल्या उदाहरणाने दिसून येत असल्याचेही त्यांनी सांगितले. सौ. अनुराधाबाई देशमुख यांच्या विभूती चमत्काराच्या बाबतीतही हे दमदाटीचे तंत्र त्यांनी मसलेचौधरी येथे जाऊन वापरून पाहिले. पण त्याला यश आले नाही, हे काही वाचकांना माहीत असेलच. मूठभर लोक गोळा करून आरडाओरड केल्याने सत्य दडपले आईल ही या लोकांसी भाबडी समजूत कोंबडा लपविल्याने सूर्य उगवणार नाही अशी भाबडी आशाबाळगणाऱ्या म्हातारीची मात्र आठवण करून देते !

**प्राचार्य अद्वयानंद गळतगे**

**भोज - ५९१२६३ जि. बेळगाव (कर्नाटक) भ्र. ९९०२००२५८**